**उपजिल्हा रुग्णालय, कारंजा जि.वाशिम येथील आहारतज्ञ, गट-क हे १ अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०१७ /प्र.क्र.४७/आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीखः २१ मार्च,२०१७

वाचा -

1) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक -पदआ २०१६/प्र.क्र.२२६/ आरोग्य -३, दिनांक- २०.१०.२०१६**
2) **आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/टे-५/ग्रा.रु.कारंजा अपद-१/आहारतज्ञ/२२३३-३४/१७, दिनांक-०२.०३.२०१७**

### शासन निर्णय-

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला यांच्या अधिपत्याखालील १०० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय, कारंजा जि.वाशिम येथील आहारतज्ञ, गट-क या एक अस्थाई पदास दि.०१.१०.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये सदर उपजिल्हा रुग्णालय, कारंजा जि.वाशिम येथील आहारतज्ञ, गट-क या एक अस्थाई पदास दि.०१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१७-२०१८ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य व स्वच्छता
००१ - संचालन व प्रशासन

००१ (०९) - महाराष्ट्र आरोग्य विकास प्रकल्पांतर्गत ग्रामिण/कुटीर रुग्णालयांमध्ये श्रेणीवर्धन (२२०१० ४६२४)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दि.- १०.०२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२११२५२१४७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.21 17:09:04 +05'30'

**( रो.दि. कदम पाटील )**
अवरसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, (वैद्यकीय) मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, वाशिम.
७. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामिण (उपजिल्हा) रुग्णालय, कारंजा जि.वाशिम.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
८. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३)